कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोरोना विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटूंबियांना विमा कवच/सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.
कै.(श्री.) भाऊसाहेब माधव सिनारे, उप शिक्षक

महाराष्ट्र शासन
शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
शासन ज्ञापन क्रमांक : सहाय्य-२०२४/प्र.क्र.५०/टीएनटी-६
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : २६ ऑगस्ट, २०२४

संदर्भ :-

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२०, दिनांक. १४.१०.२०२० व दिनांक १४.०५.२०२१
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभागाचे क्रमांक: सहाय्य-२०२०/प्र.क्र.८१/टीएनटी-६, दिनांक ०७.१२.२०२० व दिनांक १६.०३.२०२१ चे पत्र.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि. प. अहमदनगर यांचे पत्र क्र.कार्या-१/पीई २/१३९/२०२४, दि.१४/०३/२०२४
४) शिक्षण संचालक (प्राथमिक) यांचे पत्र क्र.प्राशिसं/८०२/ संकीर्ण/३३५३/२०२४, दिनांक २९/०४/२०२४

ज्ञापन :-

कै.(श्री.) भाऊसाहेब माधव सिनारे, उप शिक्षक, जिल्हा परिषद प्राथमिक शाळा, गिरवली ता.जामखेड जि.अहमदनगर यांचा कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावताना कोव्हिड-१९ मुळे दिनांक २२/०४/२०२१ रोजी मृत्यू झालेला आहे.

२. कै.(श्री.) सिनारे, यांच्या वारसास वित्त विभागाच्या संदर्भ क्र. (१) येथील दिनांक २९.०५.२०२० च्या शासन निर्णयानुसार रु.५०.०० लक्ष रकमेचे सानुग्रह सहाय्य देण्याबाबतचा प्रस्ताव शिक्षण संचालक (प्राथमिक), पुणे यांनी संदर्भ क्र. (४) येथील पत्रान्वये सादर केला आहे. तसेच मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. अहमदनगर यांनी संदर्भ क्र. (३) येथील पत्रान्वये शिफारस केली आहे.

३. कै.(श्री.) भाऊसाहेब माधव सिनारे, उप शिक्षक पदावर जिल्हा परिषद प्राथमिक शाळा, गिरवली ता.जामखेड जि.अहमदनगर येथे दिनांक २४/०६/२०१९ पासून कार्यरत होते.

४. तहसिलदार तथा इन्सीडंट कमांडर, जामखेड, जि. अहमदनगर यांच्या दिनांक ०६/०४/२०२१ रोजीच्या आदेशान्वये कै.(श्री.) सिनारे यांची कोरोना विषाणुचा संसर्ग व प्रादुर्भाव रोखणेकामी मौजे गिरवली ता.जामखेड जि.अहमदनगर येथे स्थापित ग्राम दक्षता समितीवर नियुक्त करण्यात आले होते.

५. कै.(श्री.) सिनारे यांची उपरोक्त दिनांक ०६/०४/२०२१ च्या आदेशानुसार ग्राम दक्षता समिती, मौजे गिरवली ता. जामखेड जि.अहमदनगर येथे कोरोना विषाणुचा प्रादुर्भाव रोखणेकामी दिनांक

०६/०४/२०२१ ते दि.३०/०४/२०२१ पर्यंत नेमणुक करण्यात आली असून कर्तव्यावर असताना दिनांक १४/०४/२०२१ रोजी कोव्हिड-१९ ची लागण झाली व दिनांक २२/०४/२०२१ रोजी त्यांचा मृत्यु झालेला आहे. त्यानुसार कै.(श्री.) सिनारे हे इस्पितळात दाखल होण्याच्या अथवा मृत्यूच्या दिनांकापूर्वी १४ दिवसांच्या काळात कोव्हिड-१९ कर्तव्यावर हजर असल्याबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर यांनी प्रमाणित केले आहे.

६. कै. (श्री.) सिनारे यांना दि. १४/०४/२०२१ ते दि. २२/०४/२०२१ या कालावधीत ऐशियन नोबल हॉस्पीटल, अहमदनगर येथे कोव्हिड-१९ वर उपचार करण्यात आले. उपचारा दरम्यान दिनांक २२/०४/२०२१ रोजी कोव्हिड-१९ लागण होऊन मृत्यु झाल्याचे वैद्यकीय प्रमाणपत्र फॉर्म क्र. ४ द्वारे वैद्यकीय अधिक्षक, ऐशियन नोबल हॉस्पीटल, अहमदनगर यांनी प्रमाणित केले आहे.

७. कै. (श्री.) सिनारे यांचा दिनांक २२/०४/२०२१ रोजी मृत्यु झाल्याबाबतचे निबंधक (जन्म व मृत्यु), महानगरपालिका, अहमदनगर यांनी मृत्यु प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे.

८. कै. (श्री.) सिनारे यांच्या पत्नी श्रीमती सुषमा भाऊसाहेब सिनारे यांनी त्यांच्या पतीला देय असणारी कोव्हिड-१९ विमा कवच मधील रक्कम मिळण्याबाबत दिनांक ०७/०६/२०२१ रोजीच्या निवेदनाद्वारे विनंती केली आहे. सबब, कै.(श्री.) सिनारे यांच्या वारसास वित्त विभागाच्या दि.२९/०५/२०२० च्या शासन निर्णयान्वये रु. ५० लक्ष रकमेचे सर्वकष वैयक्तिक अपघात कवच मिळावे असा प्रस्ताव शिक्षण संचालक (प्राथमिक), शिक्षण संचालनालय, पुणे यांनी सादर केला आहे.

९. मा. दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर, पारनेर जि.अहमदनगर यांनी कै. (श्री.) सिनारे यांचे कायदेशिर वारस म्हणून (१) श्रीमती सुषमा भाऊसाहेब सिनारे (पत्नी) (२) श्री. अनिकेत भाऊसाहेब सिनारे (मुलगा), (३) श्री. अक्षय भाऊसाहेब सिनारे (मुलगा), (४) श्रीमती आश्विनी भाऊसाहेब सिनारे यांना घोषित केले आहे.

१०. कै.(श्री.) भाऊसाहेब माधव सिनारे, उप शिक्षक, जिल्हा परिषद प्राथमिक शाळा, गिरवली ता.जामखेड जि.अहमदनगर यांना २२०२ ०१७३-३६ (वेतन) या लेखशिर्षातून मासिक वेतन अदा करण्यात येत असल्याचे शिक्षणाधिकारी (प्राथमिक), जिल्हा परिषद, अहमदनगर यांनी प्रमाणित केले आहे.

११. तहसिलदार तथा इन्सीडंट कमांडर, जामखेड, जि. अहमदनगर, वैद्यकीय अधिक्षक, ऐशियन नोबल हॉस्पीटल, अहमदनगर यांनी प्रमाणित केल्यानुसार व शिक्षण संचालक (प्राथमिक) यांनी कागदपत्रांची पडताळणी करून सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरुन तसेच, मा. दिवाणी न्यायाधिश कनिष्ठ स्तर, पारनेर, जि.अहमदनगर यांनी कै. (श्री.) सिनारे यांचे कायदेशिर वारस म्हणून (१) श्रीमती सुषमा भाऊसाहेब सिनारे (पत्नी) (२) श्री. अनिकेत भाऊसाहेब सिनारे (मुलगा), (३) श्री. अक्षय भाऊसाहेब सिनारे (मुलगा), (४) श्रीमती आश्विनी भाऊसाहेब सिनारे (मुलगी) यांना घोषित केल्यानुसार यांना एकत्रित रु.५० लक्ष (रुपये पन्नास लक्ष फक्त ) इतक्या रकमेचे सर्वकष वैयक्तिक अपघात विमा कवच /सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास वित्त विभागाच्या दिनांक २९/०५/२०२० च्या शासन निर्णयानुसार याद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

१२. प्रस्तुत प्रस्तावावरील खर्च वित्त विभागाच्या अभिप्रायानुसार अनौपचारिक संदर्भ क्र.७४८/व्यय-५, दिनांक २९/०७/२०२४ अन्वये खाली नमूद लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

"मागणी क्रमांक ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, (०१) प्राथमिक शिक्षण, १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य, (०१) प्राथमिक शिक्षणासाठी जिल्हा परिषदांना सहाय्य, (०१) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ यांच्या कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना सप्रयोजन अनुदाने, (२२०२ ०१७३)/३१-सहायक अनुदान-वेतनेतर."

१३. सदर निधी वितरित करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

१४. सदर शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२४०८२६१८३९२३५८२१ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2024.08.26 18:54:46 +05'30'

**( तुषार महाजन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीकरीता :-

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
२. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
३. शिक्षण उपसंचालक, पुणे विभाग, पुणे
४. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर
५. अधिक्षक, वेतन व भविष्य निर्वाह निधी पथक, (प्राथमिक), अहमदनगर

**प्रत माहितीसाठी :-**

१. वित्त विभाग (व्यय-९)/(व्यय-५), मंत्रालय, मुंबई
२. कक्ष अधिकारी/अवर सचिव (एस एम ४)/अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
३. श्रीमती सुषमा भाऊसाहेब सिनारे, १७३, सिनोरे वस्ती, पाडळी तर्फे कान्हूर, ता. पारनेर जि.अहमदनगर, पीन-४१४३०२
४. निवड नस्ती (टीएनटी-६) (प्र.क्र.५०/२०२४)